**महानगरपालिका / नगरपरिषद / नगरपंचायती यामध्ये वार्षिक एकूण उत्पन्नापैकी बांधील खर्च वजा जाता राहिलेल्या निव्वळ महसूलातील ५% रकमेमधून राबवावयाच्या महिला व बाल कल्याणासाठीच्या योजना निश्चितीकरण व मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एमयुएम-२०२१/प्र.क्र.३८५/नवि-१७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२२

वाचा : १) नगर विकास विभाग, शासन पत्र क्र. जीईएन-१०९३/७९४/प्र.क्र.६६/नवि-१४, दिनांक १७ एप्रिल, १९९३.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. जीईएन-१०९३/११९८/नवि-१४, दिनांक ३० जून, १९९३.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. जीईएन-१०९३/११९८/नवि-१४, दिनांक १४ जुलै, १९९३.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २००५/प्र.क्र.१५६/०५/नवि-२०, दिनांक ३० डिसेंबर, २००६.
४) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २००५/प्र.क्र.२५५/०५/नवि-२०, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१०.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील कलम ६२, ६३ व ६५ मध्ये सन १९९२ मध्ये शासनाने सुधारणा केली आहे. यामुळे या अधिनियमातील कलम ६५ नुसार प्रत्येक "अ" व "ब" वर्ग नगरपारिषदेने महिला व बालकल्याण समितीची स्थापना करणे बंधनकारक करण्यात आले. तसेच "क" वर्ग नगरपरिषदांना आवश्यकतेनुसार या समितीची स्थापना करता येईल, अशी तरतूद करण्यात आली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय दि.३० जून, १९९३ नुसार महिला व बालकल्याणाच्या कार्यक्रमासाठी नगरपालिकांनी त्यांच्या अर्थसंकल्पात तरतूद केलेल्या वार्षिक महसूली उत्पन्नातून बांधील खर्च वजा जाता उर्वरित रकमेच्या ५ % रक्कम राखून ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती यामध्ये महिलांकरीता विविध योजना राबविण्यासाठी महिला व बालकल्याण समिती अस्तित्वात आहे. महिला व बालकल्याण कार्यक्रमांमध्ये बदलत्या परिस्थितीनुसार बऱ्याच योजना / कार्यक्रम /कामांमध्ये बदल / सुधारणा करणे क्रमप्राप्त आहे. तसेच बहुतेक महानगरपालिका / नगरपरिषद /

नगरपंचायतींमध्ये अशा योजनांसाठी तरतूद असूनही, ती महिला व बाल कल्याणाच्या योजनांवर खर्ची पडत नाही, या अनेक बाबी लक्षात घेऊन महिलांना सर्व क्षेत्रात सक्षम करण्यासाठी, महानगरपालिका / नगरपरिषद / नगरपंचायती यामध्ये वार्षिक एकूण उत्पन्नापैकी बांधील खर्च वजा जाता राहिलेल्या निव्वळ महसूलातील ५ % तरतुदीतून महिला व बालकल्याणाच्या योजना / कार्यक्रम / कामे संदर्भाधीन शासन निर्णय दि.३० डिसेंबर, २००६ व दि. ०८ नोव्हेंबर, २०१० अन्वये निश्चित करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या योजना / कार्यक्रम यामध्ये सुधारणा करणे, तसेच या अनुषंगाने सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बालकल्याण यासाठी महानगरपालिका/ नगरपरिषद/नगरपंचायती यामध्ये वार्षिक एकूण उत्पन्नापैकी बांधील खर्च वजा जाता राहिलेल्या निव्वळ महसूलातील ५ % तरतूदीमधून खालील विवरणपत्र "अ" व "ब" मध्ये नमूद योजना / कार्यक्रम / कामे राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. :-

**विवरणपत्र "अ"**

**महिला सक्षमीकरणासाठी नागरी भागात अंमलबजावणी करावयाच्या योजना.**

| अ.क्र. | योजनेचे नांव | उद्देश |
|---|---|---|
| क) | **बेटी बचाव, बेटी पढाव** | |
| १ | मुलगी जन्माला आल्यावर तिच्या सर्वांगिण विकासासाठी आर्थिक मदत करणे. | समाजात स्त्री जन्माचे स्वागत होऊन मुलींच्या संख्या वाढविण्यास व विकासाच्या क्रियेत त्यांना सहभागी करण्यास पोषक वातावरण निर्माण करणे. |
| २ | मुलीकरिता शिष्यवृत्ती योजना राबविणे. | मुलीच्या शिक्षणास प्रोत्साहन देणे. |
| ३ | मुलींचे शाळा गळतीचे प्रमाण थांबविण्यासाठी उपस्थिती भत्ता देणे. गुणवत्ता वाढीसाठी योजना हाती घेणे. | स्त्रियांच्या शिक्षणाबाबत सकारात्मक भूमिका घेणे. |
| ४ | विधवा/निराधार महिलांच्या मुलींच्या विवाहाकरिता अर्थसहाय्य देणे. | सामाजिक बांधिलकी. |
| ५ | वाचनालय/ अभ्यासिका सुरु करणे. | शिक्षणास प्रोत्साहन देणे. |

| | | |
|---|---|---|
| ६ | मुली व महिलांना स्पर्धा परिक्षेसाठी अर्थसहाय्य करणे, [UPSC/MPSC/STAFF SELECTION/ BANKING यासारख्या विविध स्पर्धा परिक्षाकरिता.] | |
| ७ | महानगरपालिकेच्या माध्यमिक शाळामधील विद्यार्थीनीना मोफत गणवेश देणे. | मुलींच्या शिक्षण व उच्च शिक्षणास प्रोत्साहन देणे. |
| ८ | युवतींना १२ वी नंतरचे उच्च शिक्षण व परदेशातील उच्च शिक्षणासाठी अर्थसहाय्य. | |
| **ख)** | **आरोग्य संवर्धन** | |
| १ | मुलींसाठी/ महिलांसाठी अत्याधुनिक स्वच्छतागृह बांधणे व दुरुस्ती करणे. | आरोग्यविषयक जागृती करणे व याकरिता सुविधा उपलब्ध करणे. |
| २ | मुलींच्या / महिलांच्या प्रसाधनगृहामध्ये सॅनिटरी नॅपकिन व्हेंडिग मशिन व सॅनिटरी नॅपकिन उपलब्ध करुन देणे. | |
| ३ | दुर्धर आजाराने ग्रासलेल्या महिलाना (एचआयव्हीग्रस्त/ कॅन्सरग्रस्त, अर्धांगवायू, क्षयरोग इ. सारखे गंभीर आजार) NEET/RTGS/ECS द्वारे उदर निर्वाहासाठी अर्थसहाय्य करणे. | आरोग्यविषयक जागृती करणे. |
| ४ | महिलांची व बालकांची वैद्यकीय तपासणी शिबीर घेणे व शिबिरामध्ये गंभीर आजार आढळून आल्यास पुढील औषधोपचारासाठी मदत करणे. | आरोग्यविषयक जागृती करणे. |
| ५ | महिला व बालके यांचेकरिता व्यायामशाळा उभारणे. | मानसिक व भावनिक, आध्यात्मिक, सामाजिक असे सर्वांगिण आरोग्य जपणे. |
| ६ | महिलांसाठी योगा व प्राणायामाचे प्रशिक्षण. | |
| ७ | देहविक्री करणाऱ्या महिलांसाठी आरोग्यविषयक कार्यक्रम आयोजित करणे. | |
| ८ | आशा- एड्स नियंत्रण कार्यक्रम. | |
| ९ | जननी शिशु सुरक्षा कार्यक्रम | |
| १० | i) ज्या महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्या क्षेत्रातून राष्ट्रीय/राज्य/जिल्हा मार्ग जातात त्या रस्त्यांवर स्त्रीयांकरीता स्वच्छतागृहाची सोय करावी तसेच हिरकणी कक्ष उभारावे.<br>ii) स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वच्छतागृह व हिरकणी कक्ष यांची दैनंदिन देखभाल व दुरुस्तीचे काम करावे. | आरोग्य विषयक सोयी सुविधा. |

| | | |
|---|---|---|
| **ग)** | **जाणीव जागृती** | |
| १ | किशोरवयीन मुलींना लैंगिक शिक्षण, मासिक पाळी व आरोग्य विषयक जनजागृती करणे. | किशोरवयीन मुलींना आरोग्य विषयक माहिती पुरविणे व सतर्क करणे. |
| २ | महिलांसाठी / मुलींसाठी समोपदेशन केंद्र चालविणे, हेल्पलाईन चालविणे, विधी सल्ला केंद्र चालविणे. | महिलांवरील अन्याय व अत्याचार दूर करुन महिलांना योग्य न्याय मिळून देणे. |
| ३ | बाल कायदेविषयक जनजागृती कार्यक्रम आयोजित करणे. | बालकांना हक्क व अधिकाराबाबत जाणीव / जागृती करुन देणे. |
| ४ | काळजी व संरक्षणाची गरज असलेल्या बालकांसाठी काम करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना अर्थसहाय्य करणे. | बालकांचे संगोपन व पुनर्वसन करण्यास मदत करणे. |
| ५ | महिलांसाठी आरोग्य, हुंडा बंदी, स्त्री-भ्रूण हत्या जनजागृती कार्यक्रम करणे. | महिलांच्या स्थितीत सकारात्मक बदल घडविण्यासाठी समाजात दूरगामी व सकारात्मक दृष्टीकोन रुजविणे. |
| ६ | मुलगी दत्तक योजना हाती घेणे. | |
| ७ | प्रतारित पिडीत महिलांकरीता अस्तित्व पुनर्वसन योजना. | महिलांचे सक्षमीकरण करुन त्यांना समाजातील मुख्य प्रवाहात आणण्याकरीता. |
| **घ)** | **निवारा** | |
| १ | नोकरी/ शिक्षण करणाऱ्या मुली व महिलांच्या अस्तित्वातील वसतिगृहामध्ये अत्याधुनिक सोयी सुविधा निर्माण करणे.(वाचनालय, फर्निचर इ.सारखे) | मुलींना व महिलांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणून त्यास सक्षम बनविणे. |
| २ | महानगरपालिकेकडून महिला व मुलींकरीता नव्याने वसतिगृह सुरु करणे. | |
| ३ | बेघर महिलांसाठी रात्र निवारा प्रकल्प सुरु करणे. | सुरक्षितता. |
| **ट)** | **स्वयंरोजगार** | |
| १ | महिला बचत गटाच्या माध्यमातून कापडी पिशव्यांची तसेच बटवे व इतर कापडी वस्तुंची निर्मित्ती करुन वितरीत करणे. | स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देणे, प्लॅस्टिक मुक्त राज्य करुन पर्यावरण विषयक जागृती निर्माण करणे. |

| | | |
|---|---|---|
| २ | नोंदणीकृत बचत गटांना अनुदान देणे. (किमान १ वर्ष पूर्ण झालेले बचत गट) | बचत गटातील महिलांच्या व्यवहारीक ज्ञान वृध्दीगत करणे, महिलांना आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी बनविणे. |
| ३ | महिला बचत गटांना खेळते भांडवल म्हणून अर्थसहाय्य देणे. (किमान ६ महिने पूर्ण झालेले बचत गट) | बचत गटातील महिलांच्या व्यावहारीक ज्ञान वृध्दीगत करणे, महिलांना आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी बनविणे. |
| ४ | महिला बचत गट निर्मित उत्पादन विक्री/ खाद्य महोत्सव आयोजित करणे/ सॅनिटरी मार्टची निर्मीती करणे. | महिलांनी स्वत: बनविलेल्या वस्तूंचे उत्पादन करण्यासाठी प्रोत्साहन देणे. स्वयंरोजगाराचे व्यासपीठ उपलब्ध करुन देऊन त्यांना स्वावलंबी बनविणे. |
| ५ | महिला बचत गटांना व्यावसायाकरिता शिलाई मशिन / घरघंटी/पापड मशिन/ मिरची कांडप मशिन/ मसाला ग्राइंडर/ शेवया मशिन यासारख्या मशिनसाठी अर्थसहाय्य देणे. | महिलांना रोजगार/ स्वयंरोजगार उपलब्ध करुन देऊन आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी बनविणे. |
| ६ | बचत गटामार्फत उपहारगृह चालविणे. | महिलांना रोजगार / स्वयंरोजगार उपलब्ध करुन देऊन आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी बनविणे. |
| ७ | महिलांनी तयार केलेल्या वस्तु/खाद्यपदार्थांकरीता कायमस्वरुपी विकी केंद्र निर्माण करणे. | स्वयंरोजगाराचे व्यासपीठ उपलब्ध करुन देऊन स्वावलंबी बनविणे. |
| ८ | इलेक्ट्रिक दुचाकी (टु-व्हिलर) / ऑटो रिक्षा करीता अर्थसहाय्य देणे. | पर्यावरण संवर्धन व स्वयंरोजगार निर्मिती. |
| ९ | मुलींना व महिलांना व्यवसायिक व तांत्रिक प्रशिक्षण देणे. यामध्ये ब्युटीपार्लर, विमा एजंट, रिसेप्शनिस्ट, लघुलेखक, सेल्सगर्ल, परिचारिका प्रशिक्षण, फिजिओथेरपिस्ट, शोभिवंत व औषधी झाडांची लागवड व विक्री या योजना हाती घेणे. | महिलांना रोजगार/ स्वयंरोजगार उपलब्ध करुन देऊन आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी बनविणे. |
| १० | अनैतिक व्यापरातून बाहेर पडू इच्छिणाऱ्या महिला/ मुली यांच्याकरीता त्यांना रोजगार उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने पुनर्वसनाची योजना राबविणे. | |

| | | |
|---|---|---|
| **ठ)** | **कौशल्य विकास** | |
| १ | मुलींना व महिलांना व बचत गटातील महिलांना व्यावसायिक/ रिटेल मॅनेजमेंटचे प्रशिक्षण देणे. (MS-CIT, Tally, Typing, Driving, etc.) | मुलींना व महिलांना आपल्या पायावर उभे करुन व्यावसायिकदृष्ट्या सक्षम बनविणे. |
| २ | असंघटित महिलांना लघुउद्योजकाचे प्रशिक्षण देणे. | महिलांचे सामाजिक व आर्थिक सक्षमीकरण करणे. |
| ३ | व्यक्तीमत्व विकास कार्यक्रम राबविणे. (उदा.संभाषण कौशल्य, सभाधीटपणा, सुत्रसंचालन इ.) Event Management चे प्रशिक्षण देणे. | व्यक्तीचा शारिरीक, मानसिक, भावनिक, बौध्दिक व सामाजिक विकास करुन त्याच्यातील सुप्त गुणांना वाव देणे. |
| ४ | गुणगौरव कार्यक्रम हाती घेणे. | |
| **ड)** | **क्रीडा विषयक** | |
| १ | शालेय शिक्षण घेणाऱ्या मुले व मुली यांच्यासाठी विविध क्रीडा सुविधा निर्माण करणे. | मुलींना व महिलांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणून त्यास सक्षम बनविणे. |
| २ | महिला व मुलींसाठी विविध स्पर्धाचे आयोजन करणे व त्याद्वारे त्यांच्या कलागुणांना प्रोत्साहन देणे. | मुलींच्या सुप्त गुणांना वाव देणे. |
| ३ | मुली/ महिला खेळाडूकरिता (जिल्हास्तर/ राज्यस्तर, राष्ट्रीयस्तर, आंतरराष्ट्रीय खेळासाठी) गुणवत्ता प्राप्त खेळाडूकरिता शिष्यवृत्ती देणे. | खेळासाठी प्रोत्साहन देणे. |
| ४ | मुली/ महिलांना स्वरक्षणासाठी कराटे/योगा/मार्शल आर्ट यासारखे यांचे प्रशिक्षणे देणे. | मुलींमध्ये स्वरक्षणाची भावना निर्माण करणे,मुलींना शारिरीक व मानसिक दृष्ट्या सक्षम बनविणे. |
| ५ | विज्ञान शोधिका | मुलींच्या सर्वांगिण विकासाकरीता |
| ६ | संगणक वर्ग प्रकल्प | |
| **ढ)** | **आधार योजना** | |
| १ | ६५ वर्षावरील ज्येष्ठ महिलांना उदरनिर्वाहासाठी अर्थसहाय्य देणे. | ज्येष्ठ महिलांच्या चरितार्थ व कल्याणासाठी मदत करणे. |
| २ | विधवा/ निराधार महिलांना उदरनिर्वाहासाठी अर्थसहाय्य देणे. | महिलांचे सामाजिक व आर्थिक सक्षमीकरण करणे. |
| ३ | कोणत्याही कारणामुळे पतीचे / कर्त्या पुरुषाचे निधन होऊन एकल / विधवा झालेल्या महिलांच्या पुनर्वसनाबाबत योजना राबविणे. | |

| | | |
|---|---|---|
| **त)** | **पर्यावरण संवर्धन** | |
| १ | महिलांना दैनंदिन वापराकरीता तसेच व्यवसायिक प्रयोजनार्थ अपारंपरिक ऊर्जा साधने घेण्यास अर्थसहाय्य देणे. | ऊर्जेचे योग्य व्यवस्थापन, संयोजन व संवर्धन करुन पर्यावरण संतुलन राखण्यास मदत करणे. तसेच दैनंदिन कामकाजात सुलभता आणणे. |
| **थ)** | **प्रचार व प्रसिध्दी** | |
| १ | योजनांच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी पुस्तिका, जाहिरात, चित्रफित यासारखे उपक्रम राबविणे. | तळागाळातील गरजू महिलांपर्यत लोककल्याणाच्या योजना पोहचविणे. |

## विवरणपत्र "ब"

## बालकांकरीता नागरी भागात अंमलबजावणी करावयाच्या योजना.

| अ.क्र. | प्रस्तावित योजनेचे नांव | उद्देश |
|---|---|---|
| **अ)** | **बालसंगोपन / बालकल्याणकारी योजना** | |
| १ | मुलांकरिता पोषक आहार पुरविणे | मुलांचे शारिरीक व बौध्दीक वाढ होण्यास मदत करणे. |
| २ | ०-५ वर्षांच्या मुलांकरिता Creche किंवा Day Care Centre बांधणे कार्यान्वित करणे तसेच पाळणाघर चालविणाऱ्या अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य करणे. | नोकरी करणाऱ्या / अर्थाजन करणाऱ्या / व्यवसाय करणाऱ्या महिलांच्या बालकांना सुरक्षिततेतची सोय करणे. |
| ३ | नागरी भागातील अंगणवाडी केंद्र बांधकाम करणे. | एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतील लाभार्थ्यांना पायाभुत सुविधा उपलब्ध करणे. |
| ४ | अंगणवाडी/बालवाडी केंद्रातील मुलींकरिता आवश्यक शैक्षणिक व बौद्धिक क्षमता वर्धनाकरीता साहित्य खरेदी करणे. | मुलांची बौध्दिक क्षमता वाढ होण्यास मदत करणे. |
| ५ | अंगणवाडी केंद्र / बालवाडी मधील बालकांच्या वृध्दी संनियंत्रणासाठी Growth Monitoring Devices ची आवश्यकतेनुसार खरेदी तसेच दुरुस्ती करणे. | |
| ६ | शाळा/ अंगणवाडी/बालवाडी केंद्रातील मुलांसाठी शुध्द पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करणे. | मुलांचे आरोग्य अबाधित राखणे. |
| ७ | रॅक पिकर्स यांचा विमा काढणे व त्यांच्या मुलांना शैक्षणिक अर्थसहाय्य करणे. | मुलांचा सर्वांगिण विकास करणे. |

| | | |
|---|---|---|
| ८ | झोपडपट्टी आणि बांधकाम क्षेत्रातील बालकांचे लसीकरण विनामुल्य करणे. | मुलांच्या आरोग्याची काळजी घेणे. |
| ९ | कोविड-१९ व इतर कारणांमुळे एक / दोन्ही पालक गमावलेल्या अनाथ बालकांकरीता विशेष सहाय्य / उपायोजना करणे. | बालक सक्षमीकरण. |
| १० | नागरी भागातील अतितीव्र कुपोषित (SAM) बालकांकरिता विशेष आहार पुरवठा करुन त्यांना सर्वसाधारण श्रेणीत आणण्याचा प्रयत्न करणे. | बालकांच्या आरोग्याची काळजी घेवून सक्षम / आरोग्यदायी बनविणेबाबत. |
| ११ | नागरी भागातील अतितीव्र कुपोषित (SAM) बालकांच्या औषधोपचाराकरीता पोषण पुनर्वसन केंद्र (NRC) बाल उपचार केंद्र (CTC) स्थापन करणे. | |

२. उपरोक्त विवरणपत्र “अ” व “ब” मध्ये दर्शविण्यात आलेल्या योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता मार्गदर्शक सूचना पुढीलप्रमाणे आहेत:-

(१) महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती येथील आयुक्त / मुख्याधिकारी यांना प्रत्येक योजनेकरीता रु. १० लाख इतकी आर्थिक मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. तथापि, शासनाने निश्चित केलेल्या या योजना राबविण्याकरीता व प्रभावी अंमलबजावणीकरीता रु.२५ लाख प्रति योजना या आर्थिक मर्यादेपर्यंत योजनेस मान्यता देणे व योजना राबविण्याचे अधिकार संबंधित आयुक्त / मुख्याधिकारी यांना देण्यात येत आहेत. परंतु सदर खर्च करताना विहित वित्तीय नियमांचे पालन करणे आवश्यक राहिल.

(२) आयुक्त, महानगरपालिका, मुख्याधिकारी, नगरपालिका / नगरपंचायती यांनी प्रत्येक वर्षाच्या सुरुवातीपासून योजना राबविण्याचा कार्यक्रम तयार केला आहे, याची खात्री करुनच पुढील वर्षाकरीता अर्थसंकल्पिय तरतूद अंतिम करण्यात यावी.

(३) उपरोक्त विवरणपत्रांमध्ये नमूद योजना / कार्यक्रम / कामे या बाबींवर खर्च करण्याच्या प्रस्तावास नागरी स्थानिक संस्थेतील महिला व बाल कल्याण समितीची शिफारस आवश्यक राहिल. सदर शिफारशी शिवाय कोणताही प्रस्ताव / निधी मंजूर करण्यात येवू नये.

(४) जिल्हाधिकाऱ्यांनी नगरपरिषद / नगरपंचायतीचा अर्थसंकल्प मंजूर करताना गतवर्षीचा निधी खर्ची पडला आहे कि नाही, त्याची प्रथम शहानिशा करावी. अखर्चित निधी राहिल्यास तो पुढील वर्षाच्या अंदाजपत्रकामध्ये Carry forward करण्यात यावा. पुढील वर्षाच्या अंदाजपत्रकामध्ये Carry forward करण्याची सुविधा केवळ एका वर्षाकरीता राहील. विहित मुदतीत आवश्यक खर्च न झाल्यास याबाबत संबंधित आयुक्त / मुख्याधिकारी यांना जबाबदार ठरवून, त्याबाबत त्यांच्या गोपनिय अहवालात नोंद घेण्यात यावी.

(५) उपरोक्त विवरणपत्रामध्ये नमूद योजना / कार्यक्रम / कामे महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती यांनी हाती घेण्याकरीता मार्गदर्शक / सूचक स्वरुपाचे (Indicative) असून,

यामध्ये नाविन्यपुर्ण योजनांचा समावेश करण्याचे स्वातंत्र्य आयुक्त / मुख्याधिकारी यांना असेल. त्यांनी विहित पद्धतीने मान्यता घेऊन या योजनांची अंमलबजावणी करावी.

(६) महिला व बाल कल्याणासाठी करावयाच्या ५ % तरतूदीतून पुरुषांकरीताच्या योजनेवर कोणताही खर्च करण्यात येणार नाही, याची काटेकोरपणे दक्षता घ्यावी.

(७) महिला सक्षमीकरणासाठी नागरी भागात महानगरपालिका / नगरपालिका यांच्यामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांकरीता महानगरपालिका / नगरपरिषद /नगरपंचायती यामध्ये वार्षिक एकूण उत्पन्नापैकी बांधील खर्च वजा जाता राहिलेल्या निव्वळ महसूलातील ५ % रक्कम ही महिला व बाल कल्याणासाठी खर्च करण्याची तरतूद ही किमान मर्यादा असून, कमाल खर्चाच्या मर्यादेत कोणतेही बंधन असणार नाही.

३. सदर शासन निर्णय महिला व बाल विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३२९१३२३२४१०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.03.29 13:26:41 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(२) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई- २५.
(३) जिल्हाधिकारी (सर्व).
(४) आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
(५) मुख्याधिकारी, नगरपरिषद / नगरपंचायती (सर्व).
(६) विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(७) निवडनस्ती, नवि-१७.